**राज्यातील शहरांमध्ये सिंगल युज प्लास्टिक बंदीच्या प्रभावी अंमलबजावणी करिता राज्यस्तरीय व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांस्तरीय प्लास्टिक कचरा व्यवस्थापन कक्ष स्थापन करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः स्वमअ-२०२२/प्र.क्र.१०/नवि-३४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक: ३१ मार्च, २०२२**

**वाचा: -** केंद्र शासनाचे प्लास्टिक कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ व त्या खालील सुधारणा.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वाचा येथील केंद्र शासनाचे प्लास्टिक कचरा व्यवस्थापन नियम २०१६ व त्या खालील सुधारणा नियमांच्या अनुषंगाने राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये सिंगल युज प्लास्टिक बंदीच्या प्रभावी अंमलबजावणीकरिता खालीलप्रमाणे राज्यस्तरीय व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांस्तरीय प्लास्टिक कचरा व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात येत आहे.

अ) **राज्यस्तरीय प्लास्टिक कचरा व्यवस्थापन कक्ष :**

राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये सिंगल युज प्लास्टिक बंदीच्या प्रभावी अंमलबजावणी करिता राज्यस्तरावर म्हणून राज्य अभियान संचालनालयामध्ये प्लास्टिक कचरा व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात येत आहे. हा कक्ष अभियान संचालनालयातील राज्य अभियान संचालक यांच्या नियंत्रणाखालील नामनिर्देशित अधिकाऱ्याच्या नियंत्रणात कार्य करेल.

**राज्यस्तरीय कक्षाची कर्तव्ये :**

१. प्लास्टिक कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ व त्या खालील सुधारणा नियमांच्या अंमलबजावणीसाठी आणि राज्यस्तरावरील विविध विभाग यांचे समन्वयित प्रयत्न आणि संसाधनांसह सिंगल युज प्लॅस्टिक बंदीच्या अंमलबजावणीसाठी एक सर्वसमावेशक कृती आराखडा तयार करणे.
२. राज्यातील निर्माण होत असलेल्या प्लास्टिक कचऱ्याचे मूल्यमापन करुन त्याचे संकलन, पुनर्वापर आणि अंतिम विल्हेवाटीच्या संदर्भात (किमान वापर, पुनर्वापर आणि पुनर्चक्रीकरण) कार्यक्रम निश्चित करणे.
३. प्लास्टिक कचरा व्यवस्थापन नियम २०१६ व त्या खालील सुधारणा नियमांची प्रभावी अंमलबजावणी करणे आणि राज्यातील सिंगल यूज प्लॅस्टिक (एसयूपी) चा वापर टप्प्याटप्प्याने बंद करणे.
४. प्लास्टिक कचरा व्यवस्थापन नियम २०१६ व त्या खालील सुधारणा नियमांच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने प्रतिबंधित सिंगल यूज प्लॅस्टिक (एसयूपी) ला पर्यायी साधनांची निश्चिती करुन त्याचा वापर करण्यास प्रोत्साहित करणे.
५. प्लास्टिक कचरा व्यवस्थापन नियम २०१६ व त्या खालील सुधारणा नियमांच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने सुयोग्य संनियंत्रण व्यवस्था उभारणी करणे.
६. प्लास्टिक कचरा व्यवस्थापन, प्लास्टिकचा किमान वापर, पुनर्वापर आणि पुनर्चक्रीकरण याबाबत तसेच प्लास्टिक च्या प्रदुषणाबाबत व्यापक जनजागृती करण्याच्या दृष्टीने विशेष मोहीम आराखडा तयार करणे. यामध्ये शाळा, महाविद्यालये, विद्यापीठे, NCC, NSS, युवक संघटना, व्यापारी/उदयोजक संघटना, स्वयसेवी संस्था इत्यादींना समाविष्ट करुन घेऊन मोठ्या प्रमाणावर जनजागृती केली जाईल याबाबतचे नियोजन करणे.

ब. **<u>नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांस्तरीय प्लास्टिक कचरा व्यवस्थापन कक्ष :</u>**

राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये सिंगल युज प्लास्टिक बंदीच्या प्रभावी अंमलबजावणी करिता शहरस्तरावर म्हणून स्थानिक स्वराज्य संस्थेमध्ये प्लास्टिक कचरा व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात येत आहे. हा कक्ष स्थानिक स्वराज्य संस्थेतील महानगरपालिकांच्या बाबतीत उपायुक्त, घनकचरा व्यवस्थापन किंवा घनकचरा व्यवस्थापन विषय हाताळणारे विभाग प्रमुख व नगरपरिषद/नगरपंचायत यांच्या बाबतीत पाणीपुरवठा व स्वच्छता अभियंता यांच्या नियंत्रणाखाली कार्य करेल.

**<u>नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांस्तरीय प्लास्टिक कचरा व्यवस्थापन कक्षाची कर्तव्ये :</u>**

१. प्लास्टिक कचरा व्यवस्थापन नियम २०१६ व त्या खालील सुधारणा नियमांची प्रभावी अंमलबजावणी करणे आणि राज्यातील सिंगल यूज प्लॅस्टिक (एसयूपी) चा वापर टप्प्याटप्प्याने बंद करणे.

२. प्लास्टिक कचरा व्यवस्थापन नियम २०१६ व त्या खालील सुधारणा नियमांच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने प्रतिबंधित सिंगल यूज प्लॅस्टिक (एसयूपी) ला पर्यायी साधनांची निश्चिती करुन त्याचा वापर करण्यास प्रोत्साहित करणे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३१२३५३०२०२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, serialNumber=eeec7a4defed4a9827acaa40b255e88289e62111c82bcdb7dd2fe58860768930, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2022.04.01 00:58:41 +05'30'

**(अजित पालवे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.मंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) आयुक्त, तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
७) विभागीय आयुक्त (सर्व)
८) जिल्हाधिकारी (संबंधित)
९) आयुक्त, सर्व महानगरपालिका
१०) राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभिया न (नागरी) मुंबई
११) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायती (संबंधित)
१२) उप संचालक, नगरपालिका शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
१३) जिल्हा प्रशासन अधिकारी, नगरपालिका शाखा, जिल्हाधिकारी कार्यालय (संबंधित)
१४) निवडनस्ती, नवि-३४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.